**महाराष्ट्र शासन,**
नियोजन विभाग,
शासन निर्णय क्रमांकःनाविका-२००९ / प्र.क्र.१२ / का.१४२०
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २७ ऑगस्ट. २००९.

**प्रस्तावना :**

राज्यात प्रत्येक विभागाच्या उपलब्ध साधनसंपत्तीनुसार जास्तीत जास्त विकास करण्याचा शासनाचा मानस आहे. नाशिक विभागातही विकास कामांची गती वाढविण्यासाठी त्या विभागात पायाभूत सुविधा निर्माण करणे, त्यांचा दर्जा वाढविणे तसेच शैक्षणिक व आरोग्य विषयक सुविधा निर्माण करणे तसेच पर्यटनाला चालना देणे अशा प्रकारच्या योजनांची आखणी करण्याची आवश्यकता लक्षात घेऊन नाशिक विभाग विकास कार्यक्रम २००९-१०, २००१०-१० व २०११-१२ या तीन वर्षासाठी राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

नाशिक विभागाच्या विकासाची गती वाढविण्यासाठी त्या विभागात पायाभूत सुविधा निर्माण करणे, त्यांचा दर्जा वाढविणे तसेच शैक्षणिक व आरोग्य विषयक सुविधा निर्माण करणे तसेच पर्यटनाला चालना देणे इत्यादी बाबींना उपयुक्त ठरणाऱ्या नवीन योजना / बाबींचा **"नाशिक विभाग विकास कार्यक्रम-२००९"** हा कार्यक्रम शासन मंजूर करीत आहे. या कार्यक्रमाची एकूण किंमत **रु.६५०९.०९** कोटी असून त्याची विभागनिहाय व योजनानिहाय विगत सोबतच्या **परिशिष्ट अ** तपशिल देण्यात आला आहे.

२. सदर कार्यक्रम सन २००९-१० , २०१०-११ व सन २०११-१२ या तीन वर्षात राबविण्यात यावा. त्यासाठी लागणाऱ्या रकमेची तरतूद संबंधित मंत्रालयीन विभागांनी त्यांना विविध स्त्रोतातून उपलब्ध होणा-या नियतव्ययामधून / निधीमधून प्राधान्याने करावी.

३. या कार्यक्रमाची अंमलबजावणी सन २००९-१० पासून करण्याच्या दृष्टीने या कार्यक्रमात समाविष्ट योजना / कामांची आखणी करावी तसेच त्यांना प्रशासकीय व तांत्रिक मंजूरी देण्याची कार्यवाही सुध्दा मंत्रालयीन विभागांनी करावी. या कार्यक्रमात समाविष्ट योजना / कामे सन २०११-१२ अखेर पूर्ण केली जातील याची संबंधित मंत्रालयीन विभागांनी दक्षत घ्यावी व विहीत वेळेत या कार्यक्रमाची अंमलबजावणी करावी. या कार्यक्रमाच्या अंमलबजावणी व संनियंत्रणाची जबाबदारी शासन निर्णय क्रमांक खाविका-२००९/प्र.क्र.१/का.१४२० दि.१६ जुलै, २००९ प्रमाणे डॉ. संजय चहांदे अपर विकास आयुक्त, नाशिक विभाग ( सध्या सचिव,महिला व बाल विकास विभाग) यांचेकडे सोपविण्यात आली आहे. त्यांनी सदर कार्यक्रमाच्या प्रगतीचा आढावा विभागीय पातळीवर दर ३ महिन्यांनी घ्यावा व त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सुनिल सोनी )
प्रधान सचिव, नियोजन विभाग

प्रत, मा. मुख्यसचिव,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

१. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव,

२. मा.राज्यपालांचे सचिव,

३. मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,

४. मा मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

५. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग,

६. जिल्हाधिकारी, नाशिक, अहमदनगर, जळगाव, धुळे व नंदुरबार

७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक, अहमदनगर, जळगाव, धुळे व नंदुरबार

८. विशेष कार्यअधिकारी (नियोजन),विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक विभाग, नाशिक,

९. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक, अहमदनगर, जळगाव, धुळे व नंदुरबार

१०. वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई-३२,

११. सर्व मंत्रालयीन विभाग,

१२.नियोजन विभागातील सर्व अधिकारी (रोहयो वगळून),

१३.निवड नस्ती, का-१४२०.

**परिशिष्ट-अ**

# नाशिक विकास कार्यक्रम-२००९

**शासन निर्णय क्रमांक नाविका-२००९/ प्र.क्र.१२/का.१४२० दि. २७ऑगस्ट, २००९ चे सहपत्र** **(रूपये कोटीत)**

| अ. क्र. | विभागाचे नाव | योजनेचे नाव | २००९-१० | २०१०-११ | २०११- १२ | एकूण ३ वर्षाचा कार्यक्रम | प्रशासकिय विभागाने करावयाची कार्यवाही |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | एकूण | एकूण | एकूण | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| **१** | **पाटबंधारे विभाग** | १) प्रगतीपथावरील मोठे /मध्यव व लघु पाटबंधारे प्रकल्प पूर्ण करुन पाणीसाठा व सिंचन क्षमता निर्माण करणे.<br>पाणीसाठा पूर्ण व अंशतः सिंचन क्षमता निर्माण झालेले प्रकल्प (मोठे,मध्यम व लघुप्रकल्प) (वाढ, विस्तार व अन्य बाबी - भूसंपदान / पुनर्वसन, इ. धरून) | ५१५.२० | ५८६.६१ | ४७२.२० | १५७४.०१ | नाशिक विभागातील प्रगतीपथावरील मोठे/मध्यम व लघु पाटबंधारे प्रकल्प पूर्ण करुन पाण्यासाठी व सिंचन क्षमता निर्माण करण्यासाठी ३ वर्षामध्ये १५७४.०१ कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यासाठी पाटबधांरे विभागाचा एकूण १४१ चालू असलेल्या योजनांपैकी ३ वर्षात ९१ योजना पूर्ण करुन एकूण ६५५.७० द.ल.घ.मि.पाणीसाठी व ६०२७१ हेक्टर सिंचन क्षमता उपलब्ध होणार आहे. प्रामुख्याने तापी खो-यामाील अपूर्ण योजना पूर्ण करण्यासाठी गोदावरी खो-यातील पश्चिम वाहिनी नद्यांचे पाणी अडविणे, नाशिक शहरातील पूर नियंत्रणासाठी गंगापूर धरणाची उंची वाढविणे (Flood Absorption) साठी मराठवाडयातील पाण्यावर काही परिणाम न होता), ऑनलाईन रेनगेज स्टेशन, जळगाव येथे पाडळसे धरण बांधणे ही कामे समाविष्ट करण्यात आली आहेत. |
| | | | | | | | याशिवाय नाशिक शहराला गंगापूर धरणाच्या वरील बाजूस किकवी धरण या स्त्रोतापासून पिण्याच्या पाण्याची योजना करण्यास तत्त्वतः मान्यता दिली. या संदर्भात जलसंपदा विभागाने धरणाचा प्रकल्प अहवाल तयार करुन पुढील आवश्यक कार्यवाहीसाठी नगर विकास विभागाला पाठर्वविण्या यावा. |
| | | २) शासकीय उपसा सिंचन योजना | ५०.३४ | १५१.८८ | २०६.६३ | ४०८.८५ | नाशिक विभागातील एकूण १० शासकीय उपसा सिंचन योजनांवर पुढील ३ वर्षात (धुळे जिल्ह्यातील १ प्रकल्प, नंदूरबार जिल्ह्यातील १ प्रकल्प, जळगाव जिल्ह्यातील ४ प्रकल्प, अहमदनगर जिल्ह्यातील ४ प्रकल्प) रु.४०८.८५ कोटीच्या खर्चाची कामे घेण्यात येणार आहेत.तसेच ज्या खाजगी उपसा सिंचन योजना बंद झालेल्या आहेत, त्यांचे लाभक्षेत्र शासकीय योजनांमध्ये समाविष्ट करुन अशा भागांना सिंचनाचे पाणी उपलब्ध करुन देण्याचे पाटबंधारे विभागामार्फत प्रयत्न करण्यात येणार आहेत. |
| | | ३) सर्वेक्षणाची कामे | ०.४० | ११.९० | ७.७० | २०.०० | पाटबधांरे प्रकल्पाच्या सर्वेक्षणासाठी (नाशिक जिल्ह्यातील १२ प्रकल्प, धुळे जिल्ह्यातील ३ प्रकल्प, नंदूरबार जिल्ह्यातील ३ प्रकल्प, जळगाव जिल्ह्यातील २ प्रकल्प असे एकूण २० प्रकल्प) रु. २० कोटी खर्च करण्यात येणार आहे. |
| | | ४) नदी जोड प्रकल्प | ०.५० | १.०० | १.०० | २.५० | ज्या नद्यांमध्ये मोठा प्रमाणात पाण्याचा प्रवाह असतो अशा नद्यांचे पाणी कमी प्रवाहाच्या नद्यांना जोडून पुराच्या पाण्याचा लोकांना पिण्यासाठी व शेतीसाठी उपयोग होईल या दृष्टीने नद्यांची जोडणी करण्याचा प्रस्ताव मान्य करण्यात आला. धुळे, नंदूरबार, नाशिक, जळगाव व अहमदनगर ह्या पाच जिल्ह्यातील जिल्हा पातळीवरच्या नदीजोड योजनांच्या सर्वेक्षणासाठी प्रत्येक जिल्ह्याकरिता रू.५० लक्ष एवढा निधी मंजूर करण्यात आला असून त्यापैकी प्रत्येक जिल्ह्यास रू.१० लक्ष एवढा निधी सन २००९-१० मध्ये उपलब्ध करुन दिला जाईल. |
| | | **एकूण पाटबंधारे विभाग** | **५६६.४४** | **७५१.३९** | **६८७.५३** | **२००५.३६** | |
| **२** | **सहकारी उपसा सिंचन** | १) सहकारी उपसा सिचंन योजना याच्या थकीत कर्जाचा भार शासनाने उवलणे | १३०.०० | ०.०० | ०.०० | १३०.०० | उपसा सिंचन योजनेअंतर्गत कर्ज माफी संपूर्ण राज्यासाठी असून त्यात राज्य शासनाचा वाटा रु.५००.०० कोटीपर्यंत मर्यादित व एका लाभार्थीसाठी रु.२०,०००/- पर्यंत राहणार असून, ज्यामध्ये नाशिक विभागाचा हिस्सा रु.१३०.०० कोटीपर्यंत मर्यादित राहणार आहे असा अंदाज आहे. राज्य शासनाची कर्ज माफी व कर्ज परतफेड सवलत योजना २००९ ची मुदत ३१ डिसेंबर,२००९ पर्यंत वाढविण्यात आली आहे. |
| | | **एकूण सहकारी उपसा सिंचन** | **१३०.००** | **०.००** | **०.००** | **१३०.००** | |
| **३** | **जलसंधारण विभाग** | १) नाशिक विभाग पाणलोट मिशन | ४०.०० | ८०.०० | ८०.०० | २००.०० | नाशिक महसुल विभागात पाणलोट विकास मिशन स्थापन करुन त्याकरीता ३ वर्षांसाठी एकूण रु.२००.०० कोटी इतका निधी देण्याच्या प्रस्तावाला मान्यता देण्यात आली. या मिशनद्वारे नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव व अहमदनगर या जिल्ह्यात प्रत्येकी दोन मेगा पाणलोट विकसित करण्याचे ठरले. |
| | | २) जुन्या जलसंधारण कामाची दुरुस्ती | ३.०० | ८.०० | ९.०० | २०.०० | नाशिक विभागातील जुन्या ल.पा. योजानांच्या आणि को.प.चे बधांरे दुरुस्त करण्यासाठी ३ वर्षांकरिता एकूण रु.२०.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. ज्या ठिकाणी पाणी वाटप संस्था स्थापन झालेल्या आहेत व दुरुस्ती नंतर देखभांल दुरुस्तीसाठी हाती घेणार आहेत, अशा ठिकाणी दुरुस्तीची कामे हाती घेण्यात यावीत, |

| अ. क्र. | विभागाचे नाव | योजनेचे नाव | २००९-१० | २०१०-११ | २०११- १२ | एकुण ३ वर्षाचा कार्यक्रम | प्रशासकिय विभागाने करावयाची कार्यवाही |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | एकुण | एकुण | एकुण | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | **एकूण जलसंधारण विभाग** | **४३.००** | **८८.००** | **८९.००** | **२२०.००** | |
| ४ | **कृषि विभाग** | १) शेततळे | ८.१० | ८.१० | ८.३० | २४.५० | नाशिक विभागातील जमिनीच्या पृष्ठभागावरुन वाहून जाणारे पावसाचे पाणी आपत्कालीन वेळी पिकास उपलब्ध होण्याच्या दृष्टीने शेतात तळे करुन त्यात पाणी साठविणे व त्याचा उपयोग संरक्षित जलसिंचनास (Protective Irrigation) करण्यासाठी प्रत्येक जिल्ह्यास रु.४.५० कोटी तसेच आदिवासी उपयोजनामंधून नंदुरबार जिल्ह्यासाठी रु.२.०० कोटी तीन वर्षात असे एकूण रु.२४.५० कोटीची कामे करण्यात येणार आहेत. |
| | | २) कृषि व फलोत्पादन | ४.९४ | ६.०३ | ३.४० | १४.३७ | नाशिक विभागातील कृषि व फलोत्पादन कार्यक्रमासाठी एकूण रु.१४.३७ कोटी इतका निधी ३ वर्षासाठी खालील योजनेसाठी उपलब्ध करुन देण्यात येणार आहेत.<br>१) शेतक-यांना जिल्ह्यातच जैविक किडनाशकाचे उत्पादन करुन योग्य दरात उपलब्ध करुन देण्यासाठी नाशिक व नंदुरबार जिल्हा येथे प्रत्येकी रु.१.५० कोटी खर्च करुन नवीन जैविक किडनाशक प्रयोगशाळा उभारणे,<br>२) शेतक-यांना सोयीच्या ठिकाणी माती व पाणी परिक्षण प्रयोगशाळा सर्व आधुनिक सोयीसुविधासह नाशिक,धुळे, नंदुरबार<br>व जळगांव येथे उपलब्ध करुन देणे,<br>३) पिकाचे उत्पादन वाढविण्यासाठी आदिवासी व दुर्गम भागात सध्या वापरात असलेल्या बियाणात बदल करुन त्यावर सुधारित / संकरीत बियाणांचा पुरवठा करण्यासाठी बियाणे बदल कार्यक्रम. ४) फलोत्पादन प्रोत्साहनासाठी नंदुरबार येथे मिरची व्यापार व प्रक्रीया केंद्र, नाशिक येथे उर्वरित अंश तपासणी प्रयोगशाळा आणि हरितगृह तंत्रज्ञान प्रशिक्षण केंद्र, अहमदनगर येथे काढणी पश्चात तंत्रज्ञान , प्रकीया व प्रशिक्षण केंद्र, नाशिक व अहमदनगर येथे कृषि व्यापार प्रशिक्षण व माहिती केंद्र उभारणे. |
| | | ३) नंदूरबार येथे कृषी विद्यापीठ उपकेंद्र सुरु करणे | १.३३ | १.३३ | १.३४ | ४.०० | नंदुरबार जिल्ह्यात कृषि विकासाला गती देण्याच्या दृष्टीने राहुरी कृषि विद्यापिठाची उपकेंद्रे सुरू करण्याच्या प्रस्तावाला कृषि विद्यापीठाच्या मान्यतेच्या अधिन राहून व याकरिता एकूण रु.४.०० कोटी इतका निधी ३ वर्षासाठी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. |
| | | **एकूण कृषी विभाग** | **१४.३७** | **१५.४६** | **१३.०४** | **४२.८७** | |
| ५ | **सहकार व पणन विभाग** | १) कृषि प्रक्रीया सहकारी संस्थांना रा.स.वि.नि. योजनेंतर्गत अर्थसहाय्य | १०.०० | ४०.०० | ७०.०० | १२०.०० | नाशिक विभागातील प्रत्येक जिल्ह्यामध्ये प्रतिवर्षी २ सस्थांसाठी आमचूर, मिरची, बेदाणा, डाळिंब इत्यादींसाठी कृषि प्रक्रिया सहकारी संस्थांना रा.स.वि.नि. योजनेंतर्गत अर्थसहाय्य करीता एकूण रु.१२०.०० कोटी इतका निधी ३ वर्षासाठी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. |
| | | २) मल्टी प्रॉडक्टस् प्रक्रीया प्रकल्प (३ युनिट) | ९.०० | ९.०० | १२.०० | ३०.०० | नाशिक विभागातील धुळे व नंदुरबार येथे एक, अहमदनगर जिल्ह्यात एक व नाशिक जिल्ह्यात एक अशा मल्टी प्रोडक्ट प्रक्रिया प्रकल्प याकरिता एकूण रु.३०.०० कोटी इतका निधी ३ वर्षासाठी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. |
| | | ३) टर्मिनल मार्केट उभारणे | १८.०० | १८.०० | २४.०० | ६०.०० | शेतक-यांनी उत्पादीत केलेल्या नाशवंत फलोत्पादनाचे नुकसान कमी करुन त्यांना जास्तीत जास्त फायदा देण्यासाठी मध्यस्थळी साखळी कमी करण्यासाठी राज्यात नाशिक येथे टर्मिनल मार्केट स्थापन करण्याचे व या टर्मिनल मार्केटमध्ये ७० टक्के फळे व भाजीपाला, २५ टक्के अन्यधान्य व १५ टक्के पोल्ट्री, मांस, द्राक्षे, डाळींब व मोसंबी या उपात्पादनासाठी समावेश आहे. टर्मिनल मार्केटमध्ये असलेले फलोत्पादन ग्रेडिग व प्रिकुलींग करुन कोल्ड स्टोरेजमध्ये साठवण करण्याकरिता त्यांची इलेक्ट्रानिक लिलाव पध्दतीने विक्री करण्यात येऊन त्यासाठी एकूण रु.६०.०० कोटी इतका निधी ३ वर्षासाठी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. |
| | | ४) फळे व भाजीपालाकरीता शीत साखळी प्रकल्प व फॉर्म पॅक हाउस स्थापन करणे. | १२.७० | १२.७० | १९.६० | ४५.०० | नाशिक विभागातील फळे व भाजीपाला शीत साखळी प्रकल्प (नाशवंत फळांकरिता व भाजीपाल्याकरीता शीत साखळी स्थापित करणे यात वातानुकुलित वाहन, प्रिकुलिंग, कोल्ड स्टोरेज, रायपनिंग चेंबर इ. चा समावेश आहे. ही सुविधा केंद्रे नाशिक जिल्ह्यात कळवण, मालेगांव व खुद्द नाशिक अशा ३ ठिकाणी सावदा, अहमदनगर येथे १, यावल व सावदा जळगांव येथे २, साक्री, धुळे येथे १ व शहादा, नंदुरबार येथे १ अशी स्थापन करणे). या कार्यक्रमासाठी एकूण रु.३५.०० कोटी इतका निधी ३ वर्षासाठी उपलब्ध करुन देण्यात येणार आहेत. याशिवाय शित साखळी प्रकल्पाभोवती फार्म पॅक हाऊससाठी एकूण रु.१० कोटीच्या कार्यक्रमास मान्यता देण्यात आली. ज्यामध्ये पणन महामंडळातर्फे १० टक्के सहभाग व राज्य शासनातर्फे १५ टक्के सहभाग राहील. |

| अ. क्र. | विभागाचे नाव | योजनेचे नाव | २००९-१० | २०१०-११ | २०११- १२ | एकूण ३ वर्षाचा कार्यक्रम | प्रशासकिय विभागाने करावयाची कार्यवाही |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | एकूण | एकूण | एकूण | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | ५) कांदा चाळी | १०.०० | १०.०० | २०.०० | ४०.०० | नाशिक विभागात शेतक-याना कांद्याचा योग्य भाव मिळावा म्हणुन कांदा साठविण्यासाठी कांदा चाळी उभारण्यासाठी एकूण रु.४०.०० कोटी इतका निधी ३ वर्षासाठी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. |
| | | **एकूण सहकार, वस्त्रोद्योग व पणन विभाग** | **५९.७०** | **८९.७०** | **१४५.६०** | **२९५.००** | |
| **६** | **उदयोग विभाग** | १) कृषि आधारीत पारंपारिक व इतर उद्योगांचे समूह विकसित करणेबाबत. | ५.१० | २०.०० | २०.०० | ४५.१० | नाशिक विभागातील कृषि व फलोत्पादन आधारित प्रक्रिया उद्योगांना औद्यागिक पायाभुत सुविधा, समर्थ मनुष्यबळ औद्यागिक विकासास पोषक वातावरण असल्यामुळे येवला येथील पैठणी उत्पादनाचे पारंपारिक उद्योगामुळे औद्योगिक समुह विकसित करणे तसेच नाशिक जिल्ह्यात वाईन, नंदुरबार जिल्ह्यात मिरचीचा व्यवसाय करणा-या छोटा उद्योगाना सामुहिक सुविधा पुरविण्यासाठी सामुहिक संविधा केंद्र स्थापन करणे. याशिवाय अहमदनगर येथे ऑटो-अभियांत्रिकी समूहासाठी सामुहिक सुविधा केंद्राची सोय या कार्यक्रमासाठी एकूण रु.४५.१० कोटी इतका निधी ३ वर्षासाठी उपलब्ध करुन देण्यात येणार आहेत. |
| | | २) वाईन पॉलिसी २०२१ पर्यंत वाढ देणेबाबत | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | द्राक्ष वाईन उद्योगासाठी उत्पादन शुल्क सवलतीसाठी मुदत दि.२३.१२.२०११ पासून पुढे दि. ३१.१२.२०२१ पर्यंत वाढविण्यात आली आहे. मुंबई कुळ वहिवाट व शेतजमिन अधिनियामांतर्गत वाईन उद्योगांना लागणा-या द्राक्ष उत्पादनासाठी खाजगी शेतजमिनी खरेदीला परवानगी देण्याचा प्रस्ताव पुढे ठकलण्यात आला. |
| | | ३) नाशिक व सिन्नर येथील औद्योगिक वसाहतीमध्ये ट्रक टर्मिनस सुरु करणे | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | अंबड ता.नाशिक व मालेगाव, ता.सिन्नर या दोन औद्योगिक वसाहतीमध्ये म.औ.वि.मं.च्या धोरणानुसार बीओटी तत्त्वावर ट्रक टर्मिनस उभारण्यात येणार आहे व ही योजना सर्व जिल्ह्यांमध्ये राबविण्याचा प्रयत्न करण्यात यावा. |
| | | ४) श्रीरामपूर औद्योगिक वसाहतीमध्ये फुडपार्क विकसित करणे | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | श्रीरामपूर औद्योगिक वसाहतीमध्ये ८० हे. क्षेत्रावर फुडपार्क विकसित करण्यात येणार आहेत. |
| | | ५) नाशिक विभागातील एम.आय.डी.सी. वसाहतींच्या विकासाची कामे | ७३.७५ | ३०.५० | ७६.७५ | १८१.०० | नाशिक विभागात महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत वेगवेगळ्या ठिकाणी नवीन औद्योगिक वसाहतीची स्थापना तसेच विस्तार करण्यात येत असून यासाठी एकूण ९३४३.३९ हे.आर एवढे क्षेत्र संपादित होणार आहे. नाशिक विभागातील औद्योगिक वसाहतीमाील पाणीपुरवठा, जलशुध्दिकरण केंद्र, अंतर्गत रस्ते व इतर पायाभूत सूविधा पुरविण्याच्या एकूण रु.१८१ कोटी निधी तीन वर्षात उपलब्ध करुन देण्यात येणार आहेत. |
| | | **एकूण उदयोग विभाग** | **७८.८५** | **५०.५०** | **९६.७५** | **२२६.१०** | |
| **७** | **प.दु.म. विभाग** | १) अंडी उबवणी केंद्र | २.०० | ४.०० | ४.०० | १०.०० | राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत, धुळे, नाशिक, कोपरगाव (अहमदनगर) येथील अंडी उबवणी केंद्रासाठी वाढीव निधी मिळणे व नंदुरबार आणि जळगाव या जिल्ह्यात नवीन अंडी उबवणी केंद्राची स्थापना करण्यात येणार असून ३ वर्षात एकूण रु.१०.०० कोटी निधी उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. |
| | | २) पोल्ट्री इंडस्ट्रीला सहाय्य | ४.०० | ३.०० | ३.०० | १०.०० | बर्ड फ्ल्यू बाधीत जिल्ह्यामध्ये पोल्ट्रीसाठी मुलभूत सुविधा संबंधी सहाय्य देण्यासाठी योजनेला तत्वतः मान्यता देण्यात आली. याबाबत विभागाने सविस्तर प्रस्ताव सादर करावा. |
| | | **एकूण पदुम विभाग** | **६.००** | **७.००** | **७.००** | **२०.००** | |
| **८** | **सार्वजनिक बांधकाम विभाग** | १) सन २००९-१० मध्ये हाती घेतलेली कामे (सर्वसाधारण) व हाती घ्यावयाची नवीन कामे (राज्यमार्ग आणि प्रमुख जिल्हा मार्ग सर्वसाधारण) | ७७.०९ | १६६.३५ | १७०.१२ | ४१३.५६ | नाशिक विभागातील रस्ते व पूल विकासासाठी सन २००९-१०, सन २०१०-११ व सन २०११-१२ या आर्थिक वर्षात रस्ते व पूलांची महत्त्वाची कामे घेण्यासंबधी व प्रमुख जिल्हा मार्ग आणि राज्य मार्ग दर्जाच्या रस्त्यावरील सुधारणेच्या कामासाठी एकूण रु.४१३.५६ कोटीचा कार्यक्रमा घेण्यात येणार आहे. तसेच नाशिक शहरातील वाहतुक कोंडी टाळण्याच्या दृष्टीने शहराभोवती वळण रस्त्याच्या कामाच्या सर्वेक्षणाला तत्त्वतः मंजूरी देण्यात आली. |
| | | २) जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारितील रस्त्यांची सुधारणा | १०.०० | ४७.०० | ४८.२० | १०५.२० | जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारीतील रस्त्यांच्या सुधारणा करण्यात यावी. |

| अ. क्र. | विभागाचे नाव | योजनेचे नाव | २००९-१० एकूण | २०१०-११ एकूण | २०११- १२ एकूण | एकूण ३ वर्षाचा कार्यक्रम | प्रशासकिय विभागाने करावयाची कार्यवाही |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | ३) सन २००९-१० मध्ये हाती घेतलेली कामे (आदिवासी उपयोजना) | ५०.८० | २०२.०० | २०२.१७ | ४५४.९७ | नाशिक महसुल विभागातील ५ जिल्ह्यातील रस्त्यांच्या विकासासाठी आदिवासी उपाययोजनेतर्गत रु.४५४.९७ कोटी एवढा अंदाजित किंमतीची १४६२ कामे सन २००९-१० मध्ये मंजूर करण्यात आलेली असुन त्यासाठी रु.५०.८० कोटी एवढा नियतव्यय मंजूर करण्यात आलेला आहे. या कामासाठी सन २०१०-११ या आर्थिक वर्षात रु.२०२.०० कोटी आणि सन २०११-१२ मध्ये रु.२०२.१७ कोटी एवढा अतिरिक्त नियतव्यय आदिवासी उपयोजनेतुन उपलब्ध करुन देण्यात यावा. |
| | | ४) २७ तालुकास्तरीय प्रशासकीय इमारतींचे बांधकाम (२२ आदिवासी ठिकाणे आणि ५ इतर ठिकाणे) | १३.४० | २६.८० | ३१.३० | ७१.५० | नाशिक विभागातील २७ तालुक्यांच्या ठिकाणी आणि नंदुरबार येथे जिल्हा मुख्यालय सर्किट हाऊसचे बांधकाम करण्याकरीता रु.७१.५० कोटी किंमतीची कामे घेण्यात येणार आहेत. |
| | | ५) रेल्वे उडाणपुलाचे बांधकाम करणे | २०.०० | ४४.०० | ४३.०० | १०७.०० | नाशिक महसुल विभागातील ५ जिल्ह्यातील रस्ते वाहतुकीतील सुधारणा करण्यासाठी जास्त वाहतूक वर्दळ असलेल्या (टि.व्ही.यू.) रेल्वे क्रासिंगच्या ठिकाणी) ११ रेल्वे उड्डानपूलांच्या कामांना जिल्हा नाशिक मधील लासलगांव-चांदवड रस्ता, उगांव-थेटाळे-लासलगांव रस्ता, एरंडोल-नेरी-जामनेर, न्यायडोंगरी-हिरापूर रस्ता, अहमदनगर वळणरस्त्यावर निंबळक गाव, अहमदनगर वळण रस्त्यावर अरणगांव गाव, पुणतांबा गावाजवळ, सुकवद शिंदखेडा चिमठाणे रस्ता, होळ गोराणे प्रजिमा, आहवा रायपूर खांडबारा रस्ता, नंदुरबार धानोरा रस्ता या ठिकाणी ROB (राष्ट्रीय महामार्ग क्रमांक ६ वरील नवापुर व चिचपाडा येथील उड्डाणंपूलांच्या सर्वेक्षणाच्या कामासह) बाधंण्याच्या एकूण ११२ कोटीची कामे घेण्यात येणार आहेत. |
| | | **एकूण सा.बां.विभाग** | **१७१.२९** | **४८६.१५** | **४९४.७९** | **११५२.२३** | |
| ९ | **नगर विकास विभाग** | १) नगरोत्थान महाअभियान | १००.०० | १००.०० | १००.०० | ३००.०० | नाशिक विभागातील नगरोत्थान महाअभियानांतर्गत १२ नगरपालिका / महानगरपालिकांचा समावेश करण्यात आला असून एकूण रु.३०.०० कोटी न्धिाी आवश्यक आहे. या महाअभियानात पायाभूत सुविधाशी निगडीत प्रकल्प हाती घेण्यात येतील. याचा कालावधी ५ वर्षांचा असेल. या प्रकल्पातंर्गत महाराष्ट्र नागरी पायाभूत सुविधा विकास कंपनी मर्यादित (MUIDCL) मार्फत तुटीचा अर्थ भरणा करणे तसेच जे प्रकल्प PPP वर राबविण्यात येणार नाहीत अशा प्रकल्पांना कर्ज पुरवठा करणे याचा अंतर्भाव आहे. या योजनअंतर्गत नाशिक विभागातील मालेगांव, मनमाड, अहमदनगर, संगमनेर, नंदुरबार, शहादा, धुळे, तळोदा, शिरपुर वरवाडे, जळगांव, भुसावळ व श्रीगोंदा अशा शहरांचा समावेश आहे. |
| | | २) अग्निसुरक्षा अभियान | ४.२० | ११.५० | ११.०० | २६.७० | नाशिक विभागातील अग्निशमन वाहन अथवा अग्निशमन केंद्र नसलेल्या ४ नगरपरिषदा (त्र्यंबक/भगूर/पाथर्डी व श्रीगोंदा )आहेत. तर अग्निशमन वाहन आहेत, मात्र अग्निशमन केंद्र नसलेल्या २८ नगरपरिषदा व नगरपंचायत असुन एका नगरपरिषदेत किमान एक अग्निशमन वाहन देण्यासाठी रु.३० लाख प्रमाणे नाशिक विभागातील ४ नगरपरिषदा करीता रु.१.२० कोटी व अग्निशमन केंद्र नसलेल्या ३३ नगरपरिषंदांमध्ये एक अग्निशमन केंद्राचे बाधंकाम करण्यासाठी रु.७५ लक्ष या प्रमाणे एकुण रु.२६.७० कोटी इतका खर्च करण्यात येणार आहे. |
| | | ३) नाशिक नगरविकास प्राधिकरण स्थापन करणे | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | नाशिक नगर विकास प्राधीकरण करण्याच्या प्रस्तावाची नोंद घेतली व त्यास तत्त्वतः मान्यता दिली. |
| | | ४) शिर्डी विकास प्राधिकरण स्थापन करणे | ०.०० | ०.०० | ०.०० | ०.०० | शिर्डी विकास प्राधीकरण स्थापन करण्याच्या प्रस्तावाची नोंद घेतली व त्यास तत्त्वतः मान्यता दिली. |
| | | **एकुण नगर विकास** | **१०४.२०** | **१११.५०** | **१११.००** | **३२६.७०** | |
| १० | **सामान्य प्रशासन विभाग** | १) एच.ए.एल.विमानतळ येथे पॅसेंजर व निर्यात टर्मिनल इमारत बांधणे व इतर सुविधा | ३०.०० | ०.०० | ०.०० | ३०.०० | हिंदुस्थान एरॉनॉटिक्स लि. यांच्या नियंत्रणाखाली ओझर जि.नाशिक येथे व्ही.आय.पी. कक्ष, पायलेट रुम्स, कॅफेटेरीया, प्रवासी कक्ष, कार पार्कीगं इत्यांदी सुविधा, विमातळाचा हिंदुस्थान एरॉनॉटिक्स लिमिटेड मार्फत विकास करण्याचे / विस्तार करण्याचे प्रस्तावित आहे. बार्बीसाठी रु.४० कोटी निधी आणि प्राध्यम्याने उपलब्ध करावयाचा आहे. याप्रित्यर्थ्य सदर कंपनीने रु.१० कोटी अर्थसहाय उपलब्ध करण्याबाबत तयारी दर्शविली आहे. यासंदर्भात असे प्रस्तावित करण्यात येते की, सदर रु.४० कोटी खर्चापैकी सदर कंपनी आणि राज्य शासनाने रु.३० कोटी निधी उपलब्ध करून देण्यात येणार आहे. |
| | | २) शिर्डी येथील विमानतळाच्या कामाची सद्यःस्थिती | | | | | शिर्डी आणि जळगाव येथील विमानतळाच्या कामांना गती देऊन लवकर पूर्ण करण्याचे योजिले असून याबाबतीत सद्यःस्थिती अहवालाची नोंद घेतली |
| | | ३) जळगाव येथील विमानतळाच्या कामाची सद्यःस्थिती | | | | | |

| अ. क्र. | विभागाचे नाव | योजनेचे नाव | २००९-१० एकूण | २०१०-११ एकूण | २०११- १२ एकूण | एकूण ३ वर्षाचा कार्यक्रम | प्रशासकिय विभागाने करावयाची कार्यवाही |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | ४) धुळे एमआयडीसी येथे धावपट्टीची बळकटीकरण | ०.१० | ०.४० | ०.५० | १.०० | धुळे येथे धावपट्टीची लांबी वाढविण्याकरीता आवश्यक जमीन संपादन करणे,धावपट्टी विस्तारीकरण व नाईट लँडींग सुविधेसाठीच्या प्रस्तावालो मान्यता दिली. येणारा खर्च हा महाराष्ट्र विमान विकास महामंडळामार्फत करावयाचा आहे. |
| | | **एकूण सामान्य प्रशासन विभाग** | **३०.१०** | **०.४०** | **०.५०** | **३१.००** | |
| **११** | **पर्यटन विकास विभाग** | १) पर्यटन स्थळांचा विकास | १३.५० | २५.८० | २५.८० | ६५.१० | नाशिक विभागातील खालील पर्यटन स्थळे विकसित करण्याकरिता एकूण रु.६५.१० कोटीच्या प्रस्तावास (१. अहमदनगर जिल्हा भुईकोट किल्ला, श्रीक्षेत्र देवगड संस्थान व ज्ञानेश्वर समाधी नेवासा, २. धुंळे जिल्हा गोंदुर येथे पर्यटन सुविधा विकास, सिंदखेडा, कपिलेश्वर मंदिर, नागेश्वर मंदीर शिरपूर, ३. जळगांव जिल्हा पाटणा देवी मंदीर परिसर, काथळी मुक्ताई नगर आणि पाल ४. नुदंरबार जिल्हा प्रकाशा यास्थळी जोडरस्ता, घाट, भक्त निवास, प्रकाशा येथे यात्रास्थळ विकासाची कामे, तोरणमाळ विकास सर्कीट, आमळी) घेण्यांत येणार आहेत. |
| | | २) नाशिक जिल्हयात सप्तश्रृंगी, त्र्यंबकेंश्वर, कावनाई, इगतपूरी घाटंदेवी आणि निवृत्तीनाथ विकास प्राधिकरण स्थापन करणे. | १०.०० | २०.०० | ३०.०७ | ६०.०७ | नाशिक जिल्ह्यामध्ये सप्तश्रृंगी गड, इगतपुरी घाटंणदेवी, कावनाई मंदीर परिसर विकास, त्र्यंबकेश्वर व संत निवृत्तीनाथ समाधी पर्यटन स्थळ विकास, अनकाई किल्ला येवला या यात्रा स्थळांचा सर्वागीण विकास. याशिवाय नाशिक येथे पर्यटकांसाठी पर्यटन विषयक सर्व सोयी सुविधा निर्माण करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यांत आली असून रु.६०.०७ इतका निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **एकूण पर्यटन विकास विभाग** | **२३.५०** | **४५.८०** | **५५.८७** | **१२५.१७** | |
| **१२** | **सांस्कृतिक कार्य विभाग** | १) जिल्हा नाशिक कुसुमाग्रज प्रतिष्ठाण वृध्दींगत करणे तसेच अहमदनगर आणि जळगांव जिल्हयात नाटयगृह बांधकाम करणे. | १.६० | १.६० | १.८० | ५.०० | कुसुमाग्रज प्रतिष्ठान नाटगृहासह वर्ध्दींगत करण्यासाठी आणि नाटगृहाच्या बांधकामासाठीच्या प्रस्तावास मान्यता देण्यांत आली असून रु.५.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. नाशिक येथे नाटगृह सिडको मार्फत बाधंण्यात येईल. |
| | | २) दादासाहेब फाळके चित्रपट सृष्टी निर्माण करण्यासाठी (BOT तत्वावर) भूसंपादन | ०.५० | ३.०० | ६.५० | १०.०० | दादासाहेब फाळके चित्रपट सृष्टी निर्माण करण्यासाठी (BOT तत्वावर) भूसंपादनासाठीच्या रु.१०.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **एकूण सांस्कृतिक कार्य विभाग** | **२.१०** | **४.६०** | **८.३०** | **१५.००** | |
| **१३** | **वैद्यकीय शिक्षण विभाग** | १) धुळे येथील श्री. भाऊसाहेब हिरे शासकीय वैद्यकीय महाविदयालय व रुग्णालयाचे बळकटीकरण व श्रेणीवर्धन करणे. | १२.०० | २३.५५ | २३.५५ | ५९.१० | धुळे येथील श्री.भाऊसाहेब हिरे शासकीय महाविद्यालय व रुग्णालयाच्या बळकटीकरण व श्रेणीवर्धनासाठी विविध विभागांकरीता आवश्यक असलेली अद्यावत यंत्रसामुग्री खरेदी करणे तसेच नवीन बाह्यरुग्ण विभ्ांग, २५० खाटांच्या रुग्णालयाच्या इमारतीचे बांधकाम पूर्ण करणे तसेच आदिवासी विद्यार्थ्यांच्या वसतीगृहासाठी अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्यात येणार असून रु.५९.१० कोटी इतका निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **एकुण वैद्यकीय शिक्षण** | **१२.००** | **२३.५५** | **२३.५५** | **५९.१०** | |
| **१४** | **सार्वजनिक आरोग्य विभाग** | १) जी.एन.एम .नर्सिग स्कुल स्थापन करणे | ७.९५ | ७.९५ | ५.३२ | २१.२२ | नाशिक महसुल विभागातील नंदुरबार व्यतिरिक्त प्रत्येक जिल्ह्यांमध्ये ए.एन.एम. व जी.एन.एन. नर्सिग स्कुल कार्यरत आहेत. या साठी नंदुरबार या नवनिर्मित जिल्ह्यासाठी तसेच नवनिर्मित २०० खाटांच्या मालेगांव जि.नाशिक येथील सामान्य रुग्णालयाच्या ठिकाणी ए.एन.एन. व जी.एन.एम. नर्सिग स्कुल स्थापन करण्याचे प्रस्तावित केले असून रु. ३१.२२ कोटी इतक्या खर्चास मान्यता देण्यांत आली. |
| | | २) ए. एन.एम. नर्सिग स्कुल स्थापन करणे. | ३.९४ | ३.९४ | २.१२ | १०.०० | |
| | | ३) महिला रुग्णालय सुरु करणे | ५.०० | ५.०० | ८.१४ | १८.१४ | नाशिक व नंदुरबार येथे १०० खाटांचे महिला रूग्णालय करण्याच्या प्रस्तावास मान्यता देण्यांत आली असून रु.१८.१४ कोटी इतका निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ४) ग्रामीण रूग्णालयाच्या मुख्य इमारतीचे नुतनीकरण, नवीन ग्रामीण रुग्णालयास मान्यता, ट्रामा केअर युनिट, नांदूरी, जि.नाशिक येथे नविन PHC बांधणे | ५.१४ | १.१६ | ०.०० | ६.३० | सुरगाणा, जि.नाशिक येथे ग्रामीण रूग्णालयाच्या मुख्य इमारतीचे नुतनिकरण, मुल्हेर जि. नाशिक येथे नवीन ग्रामीण रुग्णालयास मान्यता, चांदवड जि.नाशिक व नवापूर जि.नंदुरबार येथे ट्रामा केअर युनिट स्थापन करणे, नांदुरी,जि.नाशिक येथे नविन PHC बांधणे मंजूर करण्यात आला असून रु.६.३० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ५) सिव्हिल हॉस्पीटल नंदुरबार येथील ब्लड बँक सुरु करणे. | ०.६० | ०.०० | ०.०० | ०.६० | नंदुरबार येथील सिव्हील हॉस्पिटल मध्ये ब्लड बँक सुरू करण्यास मान्यता देण्यात आली. त्याकरीता रु.६०.०० लक्ष इतक्या खर्चाला मान्यता देण्यात आली. |
| | | ६) जिल्हा रूग्णालय/ ग्रामीण रूग्णालय/ PHC येथे गरज असलेल्या सुविधेत वाढ | १०.०० | २०.०० | २०.०० | ५०.०० | ग्रामीण भागात आरोग्य सुविधा अधिक प्रभावी करण्यासाठी जिल्हा रूग्णालय / ग्रामीण रूग्णालय / PHC ज्या ज्या सुविधा उपलब्ध नाहीत अशा सुविधा उपलब्ध करण्यासाठी ३ वर्षात रू.५०.०० कोटी खर्च करण्यात येणार आहे. |
| | | **एकूण आरोग्य विभाग** | **३२.६३** | **३८.०५** | **३५.५८** | **१०६.२६** | |

| अ. क्र. | विभागाचे नाव | योजनेचे नाव | २००९-१० एकुण | २०१०-११ एकुण | २०११- १२ एकुण | एकुण ३ वर्षांचा कार्यक्रम | प्रशासकिय विभागाने करावयाची कार्यवाही |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| **१५** | **शालेय शिक्षण** | १) शैक्षणिक दृष्टया मागासलेल्या तालुक्यामध्ये एकलव्य मॉडेल स्कुल स्थापन करणे | २२.६२ | २२.६२ | ३०.१६ | ७५.४० | केंद्र शासनाने प्रत्येक राज्यात शैक्षणिक दृष्टा मागासलेल्या विकास गटांमध्ये मॉडेल स्कुलची स्थापना करण्याचे ठरविले आहे. मॉडेल स्कुलची शाळा भौतिक सुविधा व सोयींच्या बाबतील केंद्रीय विद्यालयाप्रमाणे असेल. तथापि, विद्यार्थी-शिक्षक प्रमाण, माहिती तंत्रज्ञानाचा वापर, शेक्षणिक वातावरण, सुयोग्य वातावरण ही वैशिष्टे असतील. जिल्हा नाशिक मधील दिंडोरी, पेठ, सुरगाना, कळवण, इंगतपूरी, धुळे जिल्हा मधील साक्री, नवापूर, तळोदा, शिरपूर, नंदुरबार जिल्हा मधील अकराणी, अक्कलकुवा व अहमदनगर जिल्हा. सादर केलेले १७ तालुके हे शैक्षणिक दृष्टा मागास असल्यामुळे व विशेषत्त्वाने मागासवर्गीयापैकी अनुसुचित जाती / जमाती बहुल तालुके असल्यामुळे प्रस्तावित करण्यात आलेले आहेत. यास मान्यता देण्यांत आली असून रु.७५.४० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | २) संगणक साक्षरता वाढविण्यासाठी आयसीटी योजना | २०.०० | ०.०० | ०.०० | २०.०० | केंद्र पुररस्कृत माहिती आणि दळण्वळण तंत्रज्ञान योजनेमधून माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांम्ध्ये संगणक प्रयोग शाळा BOTतत्त्वावर सुरु करण्यात येणार आहेत. यामुळे ग्रामीण भागात संगणक साक्षरता वाढीस लागून आधुनिक तंत्रज्ञानाची कौशल्ये विद्यार्थ्यांना अवगत होण्यासाठी होणार आहे. यासाठी रु.२०.०० कोटी निधी खर्च होणार आहे. |
| | | **एकूण शालेय शिक्षण विभाग** | **४२.६२** | **२२.६२** | **३०.१६** | **९५.४०** | |
| **१६** | **क्रीडा विभाग** | १) तालुका क्रीडा संकुलांचे बांधकाम | ११.८० | १६.५९ | २१.४० | ४९.७९ | तालुका स्तरावर क्रीडा संकुलाचे बांधकाम करणे यासाठी रु.४९.७९ कोटी खर्च करण्यात येणार आहे. |
| | | २) विभागीय जिल्हा क्रीडा संकुलाचे बांधकाम | ९.०० | १६.०० | १४.०० | ३९.०० | विभागीय / जिल्हा क्रीडा संकुलाच्या प्रचलित योजनेतून या प्रकल्पासाठी अनुदान देण्यास तसेच प्रकल्पाची उभारणी विभागीय क्रीडा संकुल समितीमार्फत करण्यास मान्यता देण्यात आली असून रु.३९.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **एकुण क्रीडा विभाग** | **२०.८०** | **३२.५९** | **३५.४०** | **८८.७९** | |
| **१७** | **उच्च व तंत्र शिक्षण विभाग** | १) तंत्र शिक्षण | २२.०० | १२.०० | १२.०० | ४६.०० | शासकीय तंत्रनिकेतन, नंदुरबार चे बांधकाम, अन्य शासकीय तंत्रनिकेतने व जळगांव शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयाचे यंत्रसामुग्री खरेदी करणे, तंत्र शिक्षण संस्थांमधील ग्रंथालय विकास, नुंदरबार तंत्रनिकेतन व जळगांव अभियांत्रिकी महाविद्यालय फर्निचर खरेदी करणे, तंत्र शिक्षण संस्थांमध्ये भाषा प्रयोगशाळा सुरु करणे, प्रशासकीय इमारती व कार्यशाळा बाधंण्यासाठी एकूण रु.४६.०० कोटी इतका खर्च होणार आहे. |
| | | २) व्यवसाय शिक्षण (औ.प्र.संस्था) | ९.१५ | २०.२१ | १५.०० | ४४.३६ | प्रशासकीय इमारती व कार्यशाळा बाधंणे, नाशिक विभागात शिक्षण वसतीगृहाचे बांधकाम (२६), जुन्या प्रशिक्षण संस्थांचा दर्जावाढ (६), विद्यमान औ.प्र.संस्थांमये अधिकचे व्यवसाय सुरु करणे असून रु.४४.३६ कोटी इतका खर्च होणार आहे. |
| | | ३) व्यवसाय शिक्षण | ९.०० | १०.०० | ७.०० | २६.०० | नाशिक विभागामध्ये सुरु करावयाच्या नवीन १४ शासकीय तांत्रिक विद्यालयाचे बांधकाम, नाशिक विभागातील ५ जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी कार्यालयाचे बांधकाम, नाशिक व धुळे येथे नवीन मॉडेल स्कूल स्थापन करणे, यासाठी रु.२६.०० कोटी निधी खर्च होणार आहे. |
| | | ४) सार्वजनिक ग्रंथालये | २.२० | २.०० | २.५० | ६.७० | नंदुरबार व अहमदनगर नवीन जिल्हा ग्रंथालयांचे बांधकाम, आस्थापना व कार्यालयीन खर्च, सार्वजनिक वाचनालयांना सहाय्यक अनुदाने. यासाठी रु.६.७० कोटी निधी खर्च होणार आहे. |
| | | **एकुण उच्च व तंत्र शिक्षण** | **४२.३५** | **४४.२१** | **३६.५०** | **१२३.०६** | |
| **१८** | **ग्राम विकास विभाग** | १) आदिवासी भागात ३०० ते ५०० लोकवस्ती असलेल्या गावांना जोडण्यासाठी ग्रामरस्ते/साकव बांधणे | ४०.०० | ४०.०० | ४०.०० | १२०.०० | आदिवासी भागात ज्या गावाची लोकसंख्या ५०० पेक्षा कमी असल्यामुळे PMGSY मध्ये घेतल्या गेल्या नाही अशा गाव वाडांना जोडण्यासाठी ग्रामरस्ते / साकव यासाठी तीन वर्षात रु.१२० कोटी खर्च करण्यात येणार आहे. |
| | | २) आदिवासी भागात ग्रामपंचायत कार्यालयाची स्थापना/निवासस्थान | १०.०० | २०.०० | २०.०० | ५०.०० | आदिवासी भागामध्ये ग्रामपंयायत कार्यालय स्थापन करण्यासाठी तसेच दुर्गम भागात कर्मचा-यांच्या निवास्थानासाठी तीन वर्षात रु.५० कोटी तरतुद करण्यात येणार आहे |
| | | **एकूण ग्राम विकास विभाग** | **५०.००** | **६०.००** | **६०.००** | **१७०.००** | |

| अ. क्र. | विभागाचे नाव | योजनेचे नाव | २००९-१० एकूण | २०१०-११ एकूण | २०११- १२ एकूण | एकूण ३ वर्षाचा कार्यक्रम | प्रशासकिय विभागाने करावयाची कार्यवाही |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १९ | पाणीपुरवठा विभाग | १) नळाने पाणीपुरवठा (नागरी) | २५.३० | ३७.६६ | ७.९१ | ७०.८७ | सुजन निर्मल महाराष्ट्र अभियानांतर्गत नाशिक जिल्ह्यातील सटाणा व मनमाड, धुळे जिल्ह्यातील धुळे व शिरपूर वरवडे, अहमदनगर जिल्ह्यातील श्रीरामपूर व अहमदनगर महानगरपालिकेच्या हद्दीतील केडगांव प्रभाग आणि नवापूर, जिल्हा नुंदुरबार या योजनेची अशा प्रकारे ७ योजनांची एकुण किंमत रु.७०.८७ कोटी असून यासाठी पुढील ३ वर्षात खर्च करण्यात येणार आहे . |
| | | २) ग्रामीण जिल्हा परिषद | २२६.७४ | ८३.३५ | ०.०० | ३१०.०९ | नाशिक विभागाकरिता तयार केलेल्या ग्रामीण पुरवठा कार्यक्रमासाठी पुढील ३ वर्षाच्या कृती आराखडानुसार जिल्हा परिषदांमार्फत ३२७४ गावे/वाडा हाताळावयाचे नियोजन असून त्यामध्ये नाशिक जिल्ह्यात ७२२, अहमदनगर जिल्ह्यात १२८२, जळगांव जिल्ह्यात ६९३, नंदुरबार जिल्ह्यात २०२, धुळे जिल्ह्यात ३७५ गावे/ वाडा या रु.३१०.०९ कोटी इतका निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ३) ग्रामीण मजीप्रा | ५.१५ | ३.०० | ०.०० | ८.१५ | महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मार्फत अहमदनगर जिल्ह्यातील ८ योजना प्रगतीप्रथावर असुन (नाशिक जिल्ह्यातील दहिवाल २६ गावे प्रादेशिक, भाटवाडी प्रादेशिक, पालखेड प्रा.पा.पुरवठा योजना, लासलगांव प्रा.पा.पुरवठा योजना, चांदवड ४४ गांव प्रा.पा.पुरवठा योजना व अहमदनगर जिल्ह्यातील देर्डे चांदवड देर्डे को-हाळे प्रा.पा.पुरवठा योजना, धारणगांव व इतर ४ गांवे, तसेच नंदुरबार जिल्ह्यातील खोंडामळी व १२ गांवे) पाणीपुरवठा नळयोजना त्या पुढील तीन वर्षात पूर्ण करण्यात येणार असून रु.८.१५ कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ४) जी.एस.डी.ए. | १२.५० | १२.५० | १२.५० | ३७.५० | ग्रामीण जनतेचा पिण्याच्या पाण्याचा प्रश्न कमी खर्चात सोडविण्यासाठी अस्तित्त्वातील हातपंपावर भुजलसर्वेक्षण व विकास यंत्रनेने विकसित केलेले दुहेरी पंपं बसविणे प्रस्तावित आहेत. नाशिक विभागातील पाच जिल्ह्यांकरीता प्रत्येकी ३०० पंप बसविणे यासाठी रु.३७.५० कोटी इतका निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ५) विंधण विहिरी विशेष दुरूस्ती तसेच विहिरीतील गाळ काढण्यासारखे महत्वाची उपाययोजना राबविणे | ३.०० | ३.०० | ४.०० | १०.०० | विंधण विहिरी विशेष दुरूस्ती तसेच विहिरीतील गाळ काढण्यासारखे महत्वाची उपाययोजना राबविण्यात येणार असून यासाठी रु.१०.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **एकूण पाणीपुरवठा विभाग** | **२७२.६९** | **१३९.५१** | **२४.४१** | **४३६.६१** | |
| २० | आदिवासी विकास विभाग | १) विशेष कृती कार्यक्रम अक्कलकुवा व धडगांव | ४४.०० | ४०.०० | ४०.०० | १२४.०० | विशेष कृती कार्यक्रम अक्कलकुवा व धडगांव राबविण्यात येणार असून यासाठी रु.१२४.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | २) आदिवासी आश्रमशाळांचे बांधकाम | ३०.०० | ३०.०० | ३०.०० | ९०.०० | आदिवासी आश्रमशाळांचे बांधकाम करण्यात येणार आहे व त्यासाठी रु.९०.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ३) आदिवासी वसतीगृहांचे बांधकाम | २०.०० | २०.०० | २०.०० | ६०.०० | आदिवासी वसतीगृहांचे बांधकाम करण्यात येणार आहे व त्यासाठी रु.६०.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ४) आदिवासी क्रिडा प्रबोधीनी स्थापन करणे | ५.०० | १०.०० | १०.०० | २५.०० | आदिवासी विद्यार्थ्यांना क्रिडा विषयक सोयी सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी नंदुरबार या आदिवासी बहुल जिल्ह्याच्या ठिकाणी मध्यवर्ती क्रिडा केंद्र व इगतपुरी येथे क्रिडा प्रबोधीनी स्थापन करण्यात येणार आहे व यासाठी रु.२५.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ५) ग्रामपंचायतीसाठी पथदिवे बसविणे | २.५० | २.५० | ०.०० | ५.०० | आदिवासी भागात ग्रामपंचायती मध्ये पथदिवे तीन वर्षात लावण्यात येणार असून यासाठी रु.५.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ६) आदिवासी संस्कृती जतनसाठी नंदूरबार येथे म्युझियम बांधणे | १.०० | २.०० | २.०० | ५.०० | आदिवासी संस्कृती जतन साठी नंदूरबार येथे म्युझियम बांधण्यात येणार असून यासाठी रु.५.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ७) सौर ऊर्जा चलित दिवे | ४.०० | ४.०० | ४.०० | १२.०० | सौर ऊर्जा चलित पथदिवे आदिवासी भागातील बसविण्यात येणार असून यासाठी रु.१२.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **आदिवासी विकास विभाग** | **१०६.५०** | **१०८.५०** | **१०६.००** | **३२१.००** | |
| २१ | सामाजिक न्याय विभाग | १) येवला मुक्तीभूमी | ४.८० | ०.०० | ०.०० | ४.८० | डॉ.बाबासाहेब आंबेडकरांचे स्मारक बाधण्याचे प्रस्तावित असून आली असून रु.४.८० कोटी खर्च करण्यात येणार आहे |
| | | २) पद्मश्री दादासाहेब गायकवाड यांचे स्मरणार्थ बांधण्यात आलेल्या सभागृहाचे अपूर्ण काम पूर्ण करणे | ५.१५ | ०.०० | ०.०० | ५.१५ | मौ.अंबेदिंडोरी, जि.नाशिक येथे पद्मश्री दादासाहेब गायकवाड यांचे स्मरणार्थ बाधंण्यात आलेल्या सभागृहाचे अपूर्ण बाधंकाम पूर्ण करणे व पद्मश्री दादासाहेब गायकवाड स्मारकाचे बाधंकाम, मुखेड सभागृह बांधण्याच्या रु.५.१५.०० कोटी इतका खर्च येणार आहे. |
| | | ३) सामाजिक न्याय भवन अहमदनगर | ४.६२ | ०.०० | ०.०० | ४.६२ | अहमदनगर येथे सामाजिक न्याय भवन बांधणे येणार असून यासाठी रु.४.६२ कोटी निधी मंजूर करण्यात आला. |

| अ. क्र. | विभागाचे नाव | योजनेचे नाव | २००९-१० | २०१०-११ | २०११- १२ | एकूण ३ वर्षाचा कार्यक्रम | प्रशासकिय विभागाने करावयाची कार्यवाही |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | एकुण | एकुण | एकुण | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | ४) निवासी शाळा | ३६.९० | ०.०० | ०.०० | ३६.९० | धुळे, अमळनेर, चाळीसगाव, जि.जळगांव व निफाड, इगतपुरी, जि.नाशिक येथे निवासी शाळा बांधणे यासाठी रु.३६.९० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ५) वसतीगृह | २९.३४ | ०.०० | ०.०० | २९.३४ | अमळनेर येथे मुलींचे वसतीगृह व राहुरी, कर्जत व सिंदखेडा येथे मुलांचे नवीन वसतिगृह बांधणे यासाठी रु.२९.३४ कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **एकूण समाजकल्याण विभाग** | **८०.८१** | **०.००** | **०.००** | **८०.८१** | |
| २२ | अल्पसंख्यांक विभाग | १) अल्पसंख्याक समाजातील सर्व प्रवर्गातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींसाठी वसतीगृह सुरू करणे | १.५० | ०.५० | ०.०० | २.०० | नाशिक, नंदुरबार, धुळे व मालेगाव येथे अल्पसंख्यांक समाजातील मुस्लिम, जैन, बौंध्द, ख्रिश्चन, शीख व पारशी या प्रवर्गातील उच्च शिक्षण घेणाऱ्या मुलींसाठी ३ वसतीगृहे सुरु करण्यात येणार असून रु.२.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | २) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील राज्य शासनाच्या विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी दुसऱ्या पाळीमध्ये अभ्यासक्रम सुरू करणेबाबत | २.८८ | ०.०० | ०.०० | २.८८ | राज्यातील ४३ अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रांपैकी नाशिक विभागातील मालेगांव, भुसावळ, धुळे, चोपडा, मनमाड, संगमनेर व श्रीरामपूर या ७ क्षेत्रातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये दुसऱ्या पाळीमध्ये अभ्यासक्रम सुरु करण्यात येणार असून यासाठी रु.२.८८ कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ३) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी क्षेत्र विकास कार्यक्रम | २.२५ | ०.०० | ०.०० | २.२५ | या योजनेतर्गत नाशिक विभागातील अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रात मुलभूत नागरी सुविधा उपलब्ध करुन देण्यात येतील. यासाठी रु.२.२५ कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ४) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांचे प्राबल्य असलेल्या राज्यातील शाळांना पायाभूत सोईसुविधांकरिता अनुदान योजना | २.५० | ०.०० | ०.०० | २.५० | या योजनेतर्गत नाशिक विभागातील नाशिक, अहमदनगर, नंदुरबार, धुळे व जळगांव या जिल्ह्यातील एकूण १२५ शाळांना पायाभूत सोईसुविधा उपलब्ध करुन देऊन शिक्षणाचा एकंदर दर्जा उंचाविण्याचा प्रयत्न करण्यासाठी रु.२.५० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **एकूण अल्पसंख्याक विभाग** | **९.१३** | **०.५०** | **०.००** | **९.६३** | |
| २३ | वन विभाग | १) वन्य जीवांसाठी अपंगालय उभारणे | ७.०० | ७.०० | २.०० | १६.०० | अहमदनगर व नाशिक जिल्ह्यातील बिबटांची संख्या वाढली आहे. उपद्रवी बिबटास पिंज-यात बंदिस्त करुन नैसगिक आदिवासात सोडण्यास बराच कालावधी लागत असल्याने बिबटे जखमी होण्याची अथवा दगावण्याची क्षक्यता असते म्हणून बिबटा निवारा केंद्र तथा वन्य जीवांसाठी अपंगालये उभारणे गरजेचे झाले आहे.बिबटांच्या संरक्षणासाठी व जखमी बिबटांच्या उपचारासाठी बेलवंडी अहमदनगर येथे बिबटा निवारा केंद्र स्थापन करणे गरजेचे आहे. यासाठी रु.१६.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | २) निसर्ग पर्यटन विकास / वन पर्यटन विकास | १०.०० | १०.०० | १०.०० | ३०.०० | धुळे व नाशिक वन वृत्तातील हलालदरी, गायमुख-खेकडा व ठाणापाडा , तोरणमाळ, घाटनदेवी सप्तश्रृंगी गड, या महत्त्वाच्या निसर्ग पर्यटन केंद्रांच्या विकासाची कामे हाती घेण्यात येणार आहेत. तसेच पर्यटकांसाठी मुलभूत सुखसुविधा उपलब्ध करून देण्यात येणार असून यासाठी रु.३०.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ३) संयुक्त वन व्यवस्थापन कार्यक्रम | २.०० | ५.०० | ५.०० | १२.०० | या कार्यक्रमांतर्गत संयुक्त वन व्यवस्थापन समित्या गठीत करण्यात आल्या असून, त्या समित्यांद्वारे रोप वनांची व जल व मृदसंधारणाची कामे करण्यात येणार आहेत.धुळे व नाशिक वन वृत्तात आदिवासींचा रहिवास मुख्यत्वे करुन वनालगत आहे. या वनांचे संरक्षण, संर्वान, विकास व व्यवस्थापन इ. कामात स्थानिक लोकांचा सक्रिय सहभांग घेण्याचे ध्येय आहे. यासाठी रु.१२.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | ४) वनवृत्तातील अभयारण्याचा विकास | ०.५० | ३.०० | २.५० | ६.०० | ॲनेरडॅम, जि.धुळे, यावल, जि.जळगाव, कळसूबाई-हरिश्चंद्रगड, जि.अहमदनगर व नांदूर-मधमेश्वर, जि.नाशिक या अभयारण्यातील दुर्मिळ व धोकाग्रस्त अशा वन्यप्राण्यांचे व वनस्पतींचे सर्वान करण्यासाठी प्रामुख्याने वन्य जीवांच्या संर्वानासाठी पिण्याच्या पाण्यासाठी पाणवठे निर्माण करणे, खादयान सुरक्षितता आणणे इ. कामे करण्यात येणार असून यासाठी रु.६.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **एकूण वन विभाग** | **१९.५०** | **२५.००** | **१९.५०** | **६४.००** | |
| २४ | विधी व न्याय विभाग | १) नाशिक विभागातील चालू असलेल्या तसेच नवीन न्यायालयाच्या इमारती बांधकामासाठी व न्यायालयांच्या निवासस्थान बांधकामासाठी तरतूद | १३.५५ | ६.४५ | ०.०० | २०.०० | मालेगांव, येवला व नादंगांव जि.नाशिक येथै चालू असलेल्या न्यायालयीन इमारतींच्या कामासाठी तसेच कोपरगावं, जि. अहमदनगर, भुसावल जि.जळगांव, नंदुरबार, इगतपूरी जि.नाशिक , साक्री जि. धुळे न्यायालयीन इमारत व पारनेर जि.अहमदनगर न्यायदंडाधिकारी निवासस्थान बांधणे. यासाठी रु.२०.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **एकुण विधी व न्याय विभाग** | **१३.५५** | **६.४५** | **०.००** | **२०.००** | |

| अ. क्र. | विभागाचे नाव | योजनेचे नाव | २००९-१० एकूण | २०१०-११ एकूण | २०११- १२ एकूण | एकूण ३ वर्षाचा कार्यक्रम | प्रशासकिय विभागाने करावयाची कार्यवाही |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| २५ | **परिवहन** | १) आर.टी.ओ. कार्यालय स्थापन करणे | १२.६७ | २२.५० | २३.५० | ५८.६७ | प्रादेशिक परिवहन कार्यालय नाशिक येथे ट्रॅफिक पार्क व अनुज्ञप्ती संकुल बांधकामासाठी व सद्याच्या इमारतीचा विस्तार व संलग्न सुविधा करीता एकुण रु. १३५५ लक्ष उप प्रादेशिक परिवहन कार्यालय मालेगांव, श्रीरामपुर आणि अहमदनगर तसेच नंदुरबार आणि धुळे जिल्ह्यातील बांधकामाकरीता व संलग्न सुविधाकरीता निधीची आवश्यकता आहे.यासाठी रु.५८.६७ कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | २) ओढा रेल्वे स्टेशन येथे गुडस टर्मिनल निर्माण करणे | ०.१० | ०.४० | ०.५० | १.०० | नाशिक विभागात ओढा रेल्वे स्टेशन येथे गुडस् टर्मिनल बांधण्यात येणार आहे. यासाठी रु.१.०० कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **एकुण परिवहन** | **१२.७७** | **२२.९०** | **२४.००** | **५९.६७** | |
| २६ | **गृह विभाग** | १) नाशिक येथे पोलीस आयुक्त,पोलिस अधिक्षक कार्यालय बांधणे | १३.६६ | २१.८६ | १९.१४ | ५४.६६ | पोलीस आयुक्त नाशिक, पोलीस अधिक्षक, नाशिक ग्रामिण, जळगाव,धुळे,नंदुरबार व अहमदनगर यांच्या अखत्यारितील पोलीस मुख्यालय, पोलीस स्टेशन, दर्ग क्षेत्र, फायरींग रेंज, क्रीडा संकूल इ. निवासी-अनिवासी इमारतीच्या बांधकामासाठी व भूसंपादना-साठी रु.५४.६६ कोटी निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **एकूण गृह विभाग** | **१३.६६** | **२१.८६** | **१९.१४** | **५४.६६** | |
| २७ | **कामगार विभाग** | १) सह संचालक औ.सु.व.आ.सं. यांचे कार्यालयासाठी /बास्पिके संचालयनालय नाशिक येथे जागा खरेदी करणे | ०.०० | ०.८८ | ०.०० | ०.८८ | उद्योग भवन सातपूर येथे M.I.D.C.जागेत जागा खरेदी करणे यासाठी नियतव्यय करावा यासाठी रु.८८.०० लक्ष निधी मंजूर करण्यात आला. |
| | | **एकूण कामगार विभाग** | **०.००** | **०.८८** | **०.००** | **०.८८** | |
| २८ | **गृहनिर्माण** | १) ग्रामीण भागातील दारिद्ररेषेखालील बेघर कुटूंबांना पक्की व चांगल्याप्रतीची घरे बांधुन देणेबाबत | ७९.७९ | ७५.०० | ७५.०० | २२९.७९ | मालेगाव येथे बहुतांशी झोपडपट्टीतील अल्पसंख्याक समाजाच्या कुटूंबांना ११,५२० घरकुले बांधून देण्याची रु.२२९.७९ कोटी इतक्या निधीच्या कार्यक्रमास मंजुरी देण्यात आली. |
| | | **एकूण गृहनिर्माण** | **७९.७९** | **७५.००** | **७५.००** | **२२९.७९** | |
| | | **एकूण नाशिक विभाग** | **२०३८.३५** | **२२७२.१२** | **२१९८.६२** | **६५०९.०९** | |